नेटअक्षरी
ई - साहित्य प्रकाशन
अंक : ४८
दिनांक : २८.११.२००९

# २६/११ एक काळीकुट्ट आठवण




संपादक -

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

सहसंपादक -

सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
सचिन काकडे ( मुंबई )
अहं ब्रम्हास्मि ( पुणे )

अतिथी संपादक-

रविंद्र भांगे ( मुंबई )

## या अंकात वाचा..

- काव्यांजली
- मुंबई मेरी जान



# काव्यांजली – A Poetic Tribute

....एक वर्ष झालं यार....

एक वर्ष झालं यार
त्या स्टॉलवर तू दिसला नाहीस
पेपर देता देता
सुट्ट्या पैशांसाठी भांडला नाहीस
चूक तुझी छोटीशी होती
तू पोटासाठी मुंबईत आलास
पोटासाठी राबता राबता
मरणाचं भय विसरुन गेलास
तू पोलिस नव्हतास,नेता नव्हतास
तू मौलवी,संन्यासी नव्हतास
मला एकच कळतं यार
तू खरंच गुन्हेगार नव्हतास
आपल्याच मस्तीत जगणाऱ्या मुंबईतला
तू एक निरुपद्रवी किडा होतास
रक्त आटवून दोन घास खाणारा
माझ्यासारखाच भुकेचा गुलाम होतास
तुझ्या रक्ताचा प्रत्येक थेंब वाहून गेला
चकचकीत झाकणांच्या गटारांतून
तसाच पुसट होत जाशील तूही
माझ्या बेशरम आठवणींतून
तशी मी श्रद्धांजली वाहिलीय तुला
एक मिनीट डोळे झाकून
तसाच जगत असतो रे मी
संवेदना वगैरे गुंडाळून ठेऊन
मला कळलं तेव्हा मी गर्जना केली होती
बदला वगैरे घ्यायची
पण काही जमलंच नाही यार
मला चिंता पडलीय वाढत्या महागाईची
बघ मी माझं कर्तव्य पार पाडलं
दोनचार डोळयांत पाणी आणलं
दोघा चौघांनी अरेरे म्हटलं
तुला गरीब बिच्चारा म्हटलं

विश्वास ठेव यार,मी माझं कर्तव्य पार पाडलं..

- महेंद्र कुलकर्णी उर्फ सॅम ( मन्नु ),मुंबई

....रक्तपिशाच्च....

यमाला फॅशनचं खुळस लागलंय
पाश फेकून गोळे गोळयांना हाती धरलंय

मरणामा धावण्याचं खुळस लागलंय
काळ वेळ न बघता लक्ष गाठायचं ठरलंय

आतंकाला आवाजाचं खुळस लागलंय
मेल्या सडल्या मुडद्यांना जागवायचं योजलंय

काळाला क्रांतीचं खुळस लागलंय
दुसरा गाल पुढे करणंच कालबाह्य झालंय

द्वेषाला संचाराचं खुळस लागलंय
ताजमहाली रक्तपिशाच्च थयथय नाचतंय

- स्वाती फडणीस ,मुंबई

*There are things that we don't want to happen but have to accept, things we don't want to know but have to learn, and people we can't live without but have to let go....*

## .... २६/११ चिरडून टाका साल्याला....

शोधून सुध्दा आज कुणी माणूस सापडणार नाही
२६/११ नंतर ज्याचं मन हेलावलं नाही
किल्येक निरपराध लोकं रक्तात न्हाऊन गेली
किल्येक निरागस कोवळी फुले उमलण्याआधी मेली
मृत्यूचा तांडव आम्ही आमच्या डोळ्यांनी साहिला
आणि सोबत माणसांत फिरणारा राक्षसही पाहिला
विसरण्यासारखे नव्हतेच काही
आणि आम्ही विसरणारही नाही
जरासे कोलमडलोय फक्त
याचा अर्थ असा नाही की सावरणार नाही
नव्या जोमाने लवकरच
उभे राहू आम्ही
असले भेकड हल्ले नक्कीच
परतवून लावू आम्ही
शंभर या,हजार या
नाहीतर सगळे मिळून या
पण मर्दाची औलाद असाल तर
फक्त समोरुन चालून या
जो तो म्हणतो,
जे झाले ते भयानक झाले
हे थांबवायला पाहिजे
त्याहूनही आता काय करायचे ?
याचा विचार व्हायला पाहिजे
२६/११ ची प्रत्येक घडी
अजूनही हळहळते आहे
त्याहूनही कसाब जिवंत आहे
हे जास्त सलते आहे
प्रत्येक शहीद आत्मा
ओरडून सांगतोय आपल्याला
पोसू नका निलाजऱ्याला
चिरडून टाका साल्याला, चिरडून टाका साल्याला

- राज जाधव , पुणे

## ....२४ तासांचा फरक....

२६/११ च्या आधी
फक्त २४ तास आधी
तीच जागा,तीच वेळ
नव्हता फक्त तो काळ

एवढ्याच फरकानं
मोठाच फरक केला
मीच जायचो पण
तो शहीद झाला

तसाही तो झालाच असता
फरक इतकाच की मला वाचवतांना
त्यानं आपला
जीव दिला असता

- डॉ.अशोक कुलकर्णी , औरंगाबाद

*An eye for eye*
*only ends up*
*making the whole world*
*BLIND ....*

## ....एक आवाहन....

१५ ऑगस्ट,२६ जानेवारी आणि आता २६/११

जसे हे दिवस जवळ येतील
तसे डॉप्लर इफेक्टप्रमाणे
रक्तातील उकळ्या वाढत जातील

सकाळी ए मेरे वतन के लोगो लागेल
आणि संध्याकाळी......जाऊ दे
लिहीलं तर काळजाला लागेल

पुन्हा डॉप्लर इफेक्ट मध्ये येईल
दोन दिवस सळसळणारं रक्तं
बर्फासारखं थंड होईल

कल्पना करा..

पायात गोळी घुसलेला एखादा पोलीस
जखम भरण्यापुरता परतलेला जवान
आग विझवतांना होरपळलेला सैनिक

शौर्यपदक स्वीकारतांना तुम्हाला कळेल
त्याच्या शरीरात भरलंय तुमचंच रक्त
काहीतरी पुन्हा आत गर्वाने सळसळेल

आणि कदाचित तुम्हाला पटणार नाही
तो वीर तिरंग्याला सलाम करतांना
जाणवेल तुमचं रक्त थंड आहे,षंढ नाही

देशसेवा करायला फक्त बंदुका लागत नाही
वेडाने भारलेलं तप्त लाल इंधनही लागतं
गोळी नसेल तर बंदूकही चालत नाही

तेव्हा एकच विनंती आहे..
कृपया नियमीत रक्तदान करा
देशसेवा आपोआप होईल

- केदार

## ....२६/११....

प्रश्न प्रेतांना विचारी,रक्त आता
झोपले का लोक सारे सुस्त आता ?

धर्मवेड्यांना दग्याचे मुल्य वाटे
प्राण घेती,जीव झाले स्वस्त आता

मारती बेसावधांना गुंड येथे
यंत्रणाही जाहली की,गुप्त आता

राहिला नाही क्षणाचाही भरोसा
दांडगे झालेत येथे मस्त आता

शाश्वती नाही कुणाला जीवनाची
जाहला विश्वास कोठे लुप्त आता ?

दुःख कोणाला मिळू दे,खंत नाही
धुंद ते आतंकवादी फक्त आता

- अरविंद चौधरी , जळगाव

*Courage is not the absence of fear, but rather the judgement that something else is more important than fear....*

## ....कर्ते आणि नाकर्ते....

काल परवाच्या अतिरेकी हल्ल्यावर
लिहायला घेतलेली कविता अपूर्णच राहिली
वातावरण बरंच निवळलं आहे
त्यामुळे कविता लिहायला जरा उशीरच झाला आहे
..
मागच्या बाँब स्फोटावरली कविता
लोकल शब्दाला यमक न मिळाल्याने
अशीच अपूर्ण आहे..असो

अतिरेकी हल्ल्यावरची कविता मात्र नक्कीच पूर्ण करेन
कारण माझा जेवढा विश्वास
अतिरेक्यांच्या कर्तेपणावर आहे
त्यापेक्षा बराच जास्त विश्वास
राजकारणी लोकांच्या नाकर्तेपणावर
आणि संयमी षंढपणावर आहे

तेव्हा या कर्ते आणि नाकर्ते पणाचे योग परत जुळतील
परत एखादा हल्ला होऊन
कविता पूर्ण करण्याची संधी उपलब्ध होईल
अगदी खात्री आहे मला

फक्त एकच प्रॉब्लेम आहे

पुढच्या अतिरेकी हल्ल्यानंतर
कविता पोस्ट करायला मी
आणि वाचायला तुम्ही
जिवंत असू का ?

- आकाश बिरारी , युके

*If we have no peace, it is because we have forgotten that we belong to each other.*

## ....कसाब....

अरे एक वर्ष झालं,आत्ता तरी सुखाने मरु द्या
मीही कुटूंबासाठीच जगलो,माझं कर्तव्य पूर्ण करु द्या
मलाही झाल्या वेदना
निष्पाप जीव घेतांना
काही संबंध नसूनही
त्यांना मृत्यू देतांना
न बघता कोणाकडे
झाडत गेलो गोळया
नकळतच सारे घडवले
खेळलो रक्ताच्या होळया
सांगितले होते त्याने
अफाट पैसा देईन
मीही करुनच झालो मोठा
तुझी गरीबी विकत घेईन
माहीत नव्हते मला
कधी कोणाला मारायचे
अट एकच होती
तो सांगेल तसे करायचे
अरे सांगितलं ना मी सर्व
मग अजून कसली वाट बघता
कसले चालवता खटले
अन कसली मैत्री जपता
करा तुम्ही तयारी आत्ता
घुसवा तुमचे सैन्य
विचारात गुंतलेलं सरकार
अन ढासळलेलं चैतन्य
घरात तुमच्या दलाल
शोधा त्यांना,द्या फाशी
तुमच्याच रक्ताचे करतात
पैशांनी गद्दारी देशाशी
करा एक हिंमत
उठा आत्ता तरी लढा
पुन्हा गिरवा नव्याने
स्वाभिमानाचा धडा
जेव्हा आमच्या सोबत
एकही गद्दार नाही येणार
मी वचन देतो पुन्हा
कसाब जन्म नाही घेणार

- अमरीश अ. भिलारे , मुंबई

# मुंबई मेरी जान....
# अतिथी संपादकाच्या लेखणीतून....



**मा**गच्या वर्षीची २६/११ ची ती काळरात्र जश्शीच्या तश्शी आजही माझ्या डोळ्यांसमोर उभी राहते.मित्रांसोबत असतांना एकामागून एक बातम्या कानावर आदळत होत्या.अरे,उधर फायरिंग हुआ, बाहर के लोग थे, एतने गये,उतने घायल..आणि असंच बरंच काही.. लोकं मेल्याची बातमी कळल्यानंतर मुंबई जिवंत झाल्यासारखे काही लोकांना वाटायला लागले.काही लोकांना अशा Breking News मध्ये कमालीचा interest असतो.ते भलतेच excite होतात आणि scene वर पोहचतात तर काही लोक नेहमीसारखेच तोंडावरची माशीही न उडवता टीव्ही चॅनल बदलत राहतात.निषेधाची काळी रिबीनही त्यांच्या सरावाची होते.
त्या क्षणी माझ्या मनात मात्र भीती नव्हती,आपलं काय होणार ही चिंता नव्हती,होती फक्त हुरहूर..की अरे,मी त्या घटनास्थळावर असायला हवं होतं,मदत केली असती आणि पोलिसांत असतो तर अतिरेक्यांना यमसदनास पाठवलं असतं.पण बघ्याची भूमिका घेतली नसती.

ती अख्खी रात्र आम्ही जागून काढली,मित्रांना,कुटूंबातल्या सदस्यांना फोन करुन धीर दिला.
यथावकाश सामान्य जीवन चालू झाले.कुणी राजकारण्यांना दोष देत होतं तर कुणी सुरक्षा व्यवस्थेला.जो तो आपापली मते हिरहिरीने मांडत होता.खरं तर अशा घटना घडल्या की,२ प्रकारची विचार प्रवृत्ती समोर येते एक म्हणजे चर्चा करुन काही उपयोग नाही,काहीजण सुपात आहे तर काहीजण जात्यात.आणि दूसरी प्रवृत्ती म्हणजे घटना घडली,आठवण तर येणार पण आपण आपलं काम करत राहू..एकतर सक्रिय राहून किंवा निष्क्रिय राहून.

२६/११ तील एक अतिरेकी कसाबला आर्थर रोड जेलमध्ये जिवंत ठेवण्यासाठी ३१ कोटीहून जास्त खर्च झालाय,अजूनही होतोय.पण,सामान्य भारतीय नागरिक खुप आशेने न्यायव्यवस्थेकडे बघतोय.जिथे मामूली पाकीटमारालाही लोक बडवून,तुडवून काढतात तिथे कसाब सारख्या अतिरेक्याला ?

ह्या सगळ्यांतून काय निकाल लागणार आहे,कधी लागणार आहे माहित नाही.

मला मात्र एक जरुर तळमळीने वाटतं,आपली संकटं दूर करायला परमेश्वर अवतार घेणार नाही. जोपर्यंत 'माथेफिरु'लोकांना त्यांची चूक कळणार नाही तोपर्यंत दहशतवाद संपणार नाही,तो निर्माण होतच राहील.
आपली मदत आपण स्वतःच व्हायला पाहिजे,स्वतःच बदलायला पाहिजे,जागरुक व्हायला पाहिजे,आणि सगळ्यात महत्वाचे म्हणजे 'संघटित' व्हायला पाहिजे.

५ काठ्या एकत्र असतील तर त्या मोडता येत नाहीत,एक काठी सहज मोडली जाते हे लोकांच्या कधी ध्यानात येणार ?

मला नेटाक्षरीने अतिथी संपादकाचा बहुमान दिला आणि माझे विचार,मनोगत मांडायची संधी दिली त्याबद्दल मनःपूर्वक आभार आणि पुढील वाटचालीसाठी भरभरुन शुभेच्छा.

## अतिथी संपादकाची ओळख – रवी कवी

**मी** रविंद्र भांगे उर्फ रव्या.मुंबईत राहणारा एक सामान्य मराठी तरुण.मी फोटो जर्नलिझम शिकतोय तसेच जाहिरात क्षेत्रात कार्यरत आहे.कवितेच्या बाबतीत म्हणायचे झाले तर कुणालाही वाटेल की रवी-कवी हे समीकरण सहज जुळेल पण मी काही कवी नाही.काही वर्षांपूवी मला खुप उत्सुकता होती की ह्या कवी लोकांना कविता सुचते कशी ?लिहता लिहता मलाही हे गुपित कळले आणि मी 'लिहता' झालो.कविता म्हणजे अनुभवांना,भावनांना शब्दांत व्यक्त करण्याचा एक उत्स्फूर्त मार्ग.बस्स,आता जे अनुभवतो ते लिहत राहतो.

## ....मुंबई मेरी जान....

मुंबईकर लवकर उठतात..का ?
बॉसचा ओरडा खावा लागेल..म्हणून
पळतात का ?
तर आज तरी विंडो सिट मिळेल..म्हणून

कामाचा बोजा अंगावर अंगावर घेत..नाही घ्यावा लागतो
आजतरी वरकमाई होईल
आणि मग दुनियाला शिव्या शाप घालीत
निघतात
मग सूर्यही हळूच दिवसातून काढता पाय घेतो
आणि मग एकदाचा दिवस मावळतो
आणि मग काय ? खरी मुंबई

पण इथे रात्रीचा दिवस होतो
पण इथे
मुंबई जेवढं देते तेवढं घेते पण

परत दूसरा दिवस
पळायला सुरुवात
पळण्याच्या शर्यतीत
एकदा मागे वळून पाहून
मागच्याचा वेग
आपल्यापेक्षा जास्त नाही ना ?
ते पाहून
इथे वेग घ्यावा लागतो
वेग..ना !!
वाघाच्या पुढे हरिणाचा जेवढा असतो ना !!
तेवढा..
बस्स अंगी वाघाची चपळाई बाळगा
हे करत..
मुंबई मेरी जान..मंत्र जपा..

- रविंद्र भांगे ,मुंबई



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.

हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com